भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती आणि शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्क प्रदाने बँकेमार्फत अदा करणेबाबत ...

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. इबीसी २०१०/ प्र.क्र. ४० / का.१२**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : ०२ मार्च, २०१०.**

**वाचा :** शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक आदिशि-१२०४/प्र.क्र.९/का.१२, दिनांक ९ ऑगस्ट, २००४.

**प्रस्तावना :** भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजना ही सन १९५९-६० पासून केंद्र शासनाकडून राज्य शासनाकडे हस्तांतरित करण्यात आलेली आहे. या योजनेअंतर्गत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना अभ्यासक्रमानुसार केंद्र शासनाने विहित केलेल्या दराने निर्वाहभत्ता अदा केला जातो. याबरोबरच शिक्षण शुल्क, परिक्षा शुल्क व कनिष्ठ महाविद्यालय/ महाविद्यालयांना देय असलेल्या फीची प्रतिपूर्ती केली जाते. त्याचप्रमाणे शिक्षण शुल्क समितीने निर्धारित केलेल्या दराने व्यावसायिक अभ्यासक्रमामध्ये प्रवेश घेतलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्काची प्रतिपूर्ती केली जाते.

२. भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती या योजनेखाली विविध शैक्षणिक अभ्यासक्रमांसाठी शिष्यवृत्तीचे प्रस्ताव संबंधित विविध शैक्षणिक संस्थांमार्फत प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांच्याकडे प्राप्त होतात. सध्याच्या काळात महाविद्यालयांची संख्या व विद्यार्थ्यांची संख्या मोठया प्रमाणात वाढलेली आहे. त्यामुळे भारत सरकार शिष्यवृत्ती आणि शिक्षण शुल्क, परिक्षा शुल्क प्रस्तावांच्या संख्येत मोठया प्रमाणात वाढ झालेली आहे. या सर्व प्रस्तावांची छाननी करणे, कोषागारांतून रक्कम पारित करणे व ती रक्कम धनाकर्षाद्वारे महाविद्यालयांकडे वर्ग करुन त्यांच्यामार्फत विद्यार्थ्यांना शिष्यवृत्तीचे व शिक्षण शुल्क व परीक्षा शुल्क रकमेचे वाटप करणे या कार्यपध्दतीस विलंब लागतो. सध्याच्या पध्दतीनुसार विद्यार्थ्यांना शिष्यवृत्तीचे वाटप संबंधित महाविद्यालयामार्फत केले जाते. काही विद्यार्थी महाविद्यालय सोडून गेले असल्यास अशा विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीची रक्कम महाविद्यालयात पडून असते. या योजनेची सर्व प्रक्रीया ही मनुष्य बळाचा वापर करुन केली जात असल्याने या योजनेमध्ये बराच विलंब लागत असून ब-याच ठिकाणी अचूकता रहात नाही असे निदर्शनास येत आहे. योजनेमधील विंलब टाळावा तसेच अंमलबजावणीमध्ये अचुकता रहावी म्हणून आदिवासी विकास विभागामार्फत राबविण्यात येणा-या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती आणि शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्काचे वितरण बँकेमार्फत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :** आदिवासी विकास विभागामार्फत राबविण्यात येणा-या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती आणि शिक्षण शुल्क व परीक्षा शुल्काची रक्कम राष्ट्रीयीकृत बँकेमार्फत अदा करण्याचा निर्णय शासनाने घेतला असून सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचना खालीलप्रमाणे देण्यात येत आहे. :-

(१) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी सन २०१०-११ या शैक्षणिक वर्षापासून सर्व महाविद्यालयांना चेक पाठविणे बंद करुन त्याऐवजी सी.बी.एस./ ई.सी.एस. पध्दतीचा अवलंब करावा. त्यासाठी त्यांनी ज्या राष्ट्रीयीकृत बँकेत सी.बी.एस./

ई.सी.एस. ची सुविधा उपलब्ध आहे त्या बँकांमध्ये सर्व महाविद्यालयांनी व विद्यार्थ्यांनी खाती उघडण्याबाबत माहिती कळवावी.

(२) विद्यार्थ्यांचे खात्यावर सी.बी.एस./ई.सी.एस. पध्दतीद्वारे शिष्यवृत्तीची रक्कम जमा करण्यासाठी पायलट प्रोजेक्ट म्हणून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, मुंबई यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील कमीत कमी तीन महाविद्यालयांची निवड करावी. यामधील एक महाविद्यालय हे व्यावसायिक अभ्यासक्रम शिकविणारे असावे. या तीन महाविद्यालयांनी सर्व विद्यार्थ्यांचे ज्या बँकेमध्ये सी.बी.एस. व ई.सी.एस.ची सुविधा उपलब्ध आहे अशा राष्ट्रीयीकृत बँकेत खाते उघडण्याबाबत कार्यवाही करावी. त्या महाविद्यालयातील विद्यार्थ्यांच्या खात्यात प्रकल्प अधिकारी यांनी शिष्यवृत्तीची रक्कम जमा करावी.

(३) उर्वरीत महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांच्या खात्यावर शिष्यवृत्तीची रक्कम जमा करण्याची कार्यवाही संबंधित महाविद्यालय करतील. सदर महाविद्यालयांनी चेक ऐवजी सी.बी.एस. /ई.सी.एस. प्रणालीद्वारे शिष्यवृत्तीचे वाटप करावे.

(४) यासंदर्भातील सॉफ्टवेअरची वाट न पहाता महाराष्ट्रातील सर्व महाविद्यालयांनी शिष्यवृत्ती घेणा-या सर्व विद्यार्थ्यांचे दिनांक ३०/६/२०१० पर्यंत सी.बी.एस. व ई.सी.एस.ची सुविधा उपलब्ध असलेल्या राष्ट्रीयीकृत बँकेमध्ये खाती उघडावीत आणि दिनांक १/७/२०१० पासून सी.बी.एस. /ई.सी.एस. द्वारे विद्यार्थ्यांच्या बँकखात्यामध्येच शिष्यवृत्तीची रक्कम जमा करावी.

(५) ज्या विद्यार्थ्यांचे इतर बँकांमध्ये खाती आहेत त्यांनी दिनांक ३०/०६/२०१० पर्यंत सी.बी.एस./ई.सी.एस.ची सुविधा उपलब्ध आहे अशा राष्ट्रीयीकृत बँकेमध्ये खाती उघडणे आवश्यक आहे. जोपर्यंत याबाबतचे सॉफ्टवेअर तयार होत नाही तोपर्यंत विद्यार्थ्यांच्या खात्यावर संबंधित महाविद्यालयांकडून सी.बी.एस./ई.सी.एस.मार्फत शिष्यवृत्तीचे पैसे जमा करण्यांत येतील. सॉफ्टवेअर तयार झाल्यानंतर शासनाकडून थेट विद्यार्थ्यांच्या खात्यामध्ये शिष्यवृत्तीचे पैसे जमा करण्यात येतील.

(६) जी राष्ट्रीयीकृत बँक विद्यार्थ्यांच्या भ्रमणध्वनीवर शिष्यवृत्तीची रक्कम जमा झाल्याचा संदेश (SMS) मोफत पाठवेल तसेच विद्यार्थ्यांचे शुन्य शिलकीचे (झिरो बॅलन्स) खाते उघडण्यास तयार असेल अशा राष्ट्रीयकृत बँकेस प्राधान्य द्यावे.

२. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय यांनी या शासन निर्णयास व्यापक प्रमाणावर प्रसिध्दी द्यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेब-साईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००२२६१७३०५०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( ग.गो. पंचभाई )
शासनाचे सह सचिव

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व मा. मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक.
प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग , मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
कुलगुरु, सर्व विद्यापीठे.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई. (प्रसिध्दीसाठी)
संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, नागपूर, अमरावती.
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
निवडनस्ती. (का.१२)

--------